अनधिकृत बांधकामे/अतिक्रमण नियंत्रण व निर्मुलनासाठी आयुक्त, ठाणे महानगरपालिका यांच्याकरिता पोलीस आयुक्त, ठाणे शहर यांचे आस्थापनेवरील पोलीस दलातील विविध संवर्गातील १०६ निर्माण केलेल्या पदांना मुदतवाढ मिळणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : सीटीई-०३१५/प्र.क्र. २३९ /पोल-३**

२ रा मजला,मुख्य इमारत, मादाम कामा मार्ग

हुतात्मा राजगुरु चौक,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २३ जुलै २०१५

वाचा

१) शासन निर्णय, गृह विभाग क्र.अेपीओ-०३१४/प्र.क्र.७/पोल-३,दिनांक १ सप्टेंबर २०१४

२) पोलीस महासंचालक, म.रा., मुंबई यांचे पत्र क्र.पोमस/२६ ब/संकिर्ण बैठक/ अतिक्रमण/४१/२०१२, दिनांक १ जुलै २०१५

३) शासन निर्णय,वित्त विभाग क्र.पदनि-२०१५/प्र.क्र.५/१५/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २० फेब्रुवारी २०१५

**शासन निर्णय**

गृह विभाग शासन निर्णय दिनांक १ सप्टेंबर २०१४ अन्वये ठाणे महानगरपालिका क्षेत्रातील अनधिकृत बांधकामे / अतिक्रमण नियंत्रण व निर्मुलनासाठी पोलीस आयुक्त, ठाणे शहर यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली ठाणे महानगरपालिका (क वर्ग) क्षेत्रात सोबतच्या विवरणपत्र -अ मध्ये दर्शविल्याप्रमाणे नागरी पोलीस यंत्रणेसाठी विविध संवर्गातील ७८ पदे निर्माण करण्यास तसेच विवरणपत्र-ब मधील पोलीस आयुक्त कार्यालयाशी संलग्न आर्थिक गुन्हे शाखेत नागरी गुन्ह्यांची नोंदणी, तपास व खटला भरण्यासाठी विशेष कक्ष स्थापन करण्याकरिता विविध संवर्गातील २८ पदे अशी एकूण १०६ पदे पोलीस आयुक्त, ठाणे शहर यांच्या आस्थापनेवर निर्माण करून त्यांच्या सेवा ठाणे महानगरपालिकेकरिता उपलब्ध करुन देण्यास मान्यता दिलेली आहे.

२. आता पोलीस आयुक्त, ठाणे शहर यांच्या आस्थापनेवर शासन निर्णय दिनांक १ सप्टेंबर, २०१४ मधील विवरणपत्र-अ व विवरण पत्र-ब प्रमाणे निर्माण केलेल्या एकुण १०६ अस्थायी पदांना **दिनांक १ सप्टेंबर २०१५ ते दिनांक २९ फेब्रुवारी,२०१६** पर्यंत खालील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

१) सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त पदे वगळून उर्वरित पदांना मुदतवाढ देण्यात यावी. तसेच पदे ज्या कारणास्तव ज्या अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूर केली आहेत, त्याचे पालन करण्यात यावे.

२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तिय सुधारणा-१, दिनांक १० सप्टेंबर २००१ आणि क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२/२००४/वित्तिय सुधारणा-१, दिनांक १९ ऑगस्ट

२००४ नुसार पदांच्या आढाव्याची कार्यवाही तातडीने पूर्ण करुन कार्यालयाचा सुधारित आकृतीबंध उच्चस्तरीय सचिव समितीकडून अंतिमत: मान्य करुन घेण्याबाबतचा प्रस्ताव तात्काळ शासनास सादर करण्यात यावा.

३) दिनांक २९ फेब्रुवारी २०१६ पूर्वी पदांच्या आढाव्याची कार्यवाही पूर्ण न झाल्यास, वरील अस्थायी पदांना त्या पुढील कालावधीसाठी मुदतवाढ न मिळाल्यास व त्यामुळे अधिकारी / कर्मचारी यांच्या वेतन व भत्याचा प्रश्न निर्माण झाल्यास संबंधित कार्यालयाची जबाबदारी राहिल.

३. गृह विभाग, शा.नि. दिनांक १ सप्टेंबर,२०१४ मधील अट क्र.१ ते ९ ह्या ठाणे महानगरपालिकेवर बंधनकारक राहतील. सदर अटींचे रितसर पालन होत असल्याबाबतचा ठाणे महानगरपालिका व पोलीस आयुक्त, ठाणे शहर यांनी संयुक्तपणे तपासून सादर केलेला तपशील पुढील मुदतवाढीच्या प्रस्तावासोबत सादर करावा. सदर तपशिल सादर केल्याशिवाय सदरहू पदांना पुढील मुदतवाढ मिळणार नाही.

४. हा शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-पदनि-२०१५/प्र.क्र.५/१५/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २० फेब्रुवारी २०१५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२३१६२५५२५५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPT,CID - 918120, postalCode=400032, st=Maharashtra, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2015.07.23 16:29:56 +05'30'

**द.ह.कदम**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१. प्रधान सचिव, नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
२. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. पोलीस आयुक्त, ठाणे शहर
४. आयुक्त, ठाणे महानगरपालिका.
५. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई .
६. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
९. जिल्हा कोषागार अधिकारी,ठाणे
१०. वित्त विभाग (व्यय-७) / वित्तिय सुधारणा-१.
११. निवड नस्ती.